महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेस
मधून प्रवास करणा-या पोलीस कर्मचारी/कैदी
यांच्या सवलतीपोटी खर्चास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक एमआयएसं ०१९८/३३/१०२/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २६ नोव्हेंबर २००२.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृ.वि., क्रमांक एमआयएस ०१९८/९(४४)पीआरएस-२, दिनांक ८.३.१९९९.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे क्रमांक राप/वाह/पोमोवा/१४९, दिनांक ३.६.२००२ चे अ.शा.पत्र.

३) कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय), पुणे यांचे क्रमांक एसटी पेमेंट/ढोबळ रक्कम/२७२९/११४/८२७/क.३, दिनांक १९/२० जुलै २००२ चे पत्र.

**शासन निर्णय:-** महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास त्यांच्या बसेसमधून कारागृह कर्मचारी तसेच कैद्यांच्या प्रवास खर्चापोटी कारागृह विभागामार्फत रक्कम महामंडळाला देण्यात येते. सन १९९८-९९ ते २००१-०२ या वर्षाकरिता महामंडळाने कारागृह विभागाकडे रु.१,२६,५६,७२१/- (रुपये एक कोटी सव्वीस लाख छप्पन हजार सातशे एकवीस फक्त) इतक्या रकमेची थकबाकी दर्शविलेली आहे. सदर दर्शविलेली रक्कम ढोबळ मानाने असल्याने या प्रयोजनासाठी प्रत्यक्ष होणारा खर्च प्रशासकीय मान्यतेच्या मंजूरीसाठी पाठविण्याबाबत वित्त विभागाने कळविले होते. त्यास अनुसरुन कारागृह उपमहानिरीक्षक यांनी त्यांच्या दिनांक १९/२० जुलै २००२ च्या पत्रानुसार सन २००१-२००२ पर्यन्त महामंडळास त्यांच्या बसेसमधून कारागृह कर्मचारी तसेच कैद्यांच्या प्रवास खर्चापोटी रु.७५,२१,६७७/- इतका प्रत्यक्ष खर्च झाल्याचे कळविले आहे. सदर रुपये ७५,२१,६७७/- (रुपये पंच्याहत्तर लाख एकवीस हजार सहाशे सत्त्याहत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तथापि या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पात रुपये २५.०० लाख (रुपये पंचवीस लाख फक्त) इतकी रक्कम उपलब्ध असल्याने तेवढी रक्कम वित्त विभागाच्या क्रमांक संकीर्ण १०.०२/प्र.क्र.२७/ अर्थोपाय, दिनांक ५.६.२००२ च्या अर्ध शासकीय पत्रातील सूचनेच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मंजूरी देत आहे. ही रक्कम तात्काळ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यात यावी.

यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्यलेखाशिर्ष "२०५६-तुरुंग ००१ संचालन व प्रशासन (०० ) (०१) कारागृह निरीक्षणालय, २० इतर खर्च दत्तमत (२०५६ ००२ ६१)" या खाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००२-०३ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-१२३२/२००२/व्यय-८. दिनांक ३०.१०.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. ना. माळी )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), पुणे,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/नागपूर,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

उपमहाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,

कोषागार अधिकारी, पुणे-८,

वित्त विभाग, (व्यय-८),

गृह विभाग, बीयुडी-१,/पोल-५ब,

निवड नस्ती.